**शासनाचे इतर विभाग, वित्तीय संस्था व इतर यांना संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ या अधिकार अभिलेख Application Programming Interface (APIs) व्दारे उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकिर्ण-२०२१/प्र.क्र.२३५/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : १८ एप्रिल , २०२२

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्रमांक :-राभूअ-२०१३/प्र.क्र.३२/ल-१, दिनांक २३.०१.२०१३.
२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्रमांक :-राभूअ-२०१८/प्र.क्र.३४/ल-१, दिनांक ३१.०१.२०१९.
३) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्रमांक :-राभूअ-२०१८/प्र.क्र.३९७/ल-१, दिनांक ३१.०१.२०१९.
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्रमांक रा.भू.४/निशुल्क ७/ब/बारा/२०२१, दिनांक१७.०६.२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यात डिजीटल भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम ई-महाभूमि या नावाने राबविण्यात येत आहे. ई-महाभूमि अंतर्गत विकसीत करण्यात आलेल्या आज्ञावलीमधून गा.न.नं.७/१२, गा.न.नं.८-अ व गा.न.नं.६ या अधिकार अभिलेखांच्या नक्कला संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने ऑनलाईन पध्दतीने संदर्भाधीन क्रमांक २ अन्वये ठरविण्यात आलेले शुल्क/रक्कम आकारण्यात येवून उपलब्ध करून देण्यात येत आहेत. परंतु, इतर विभाग, वित्तीय संस्था व इतर यांना संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ या अधिकार अभिलेख Application Programming Interface (APIs) व्दारे उपलब्ध करून देण्याबाबत किती शुल्क आकारण्यात यावे, याबाबत कोणताही धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला नव्हता. ई-महाभूमि अंतर्गत विविध प्रकल्पाकरीता अज्ञावली विकसीत करण्यासाठी व विकसीत करण्यात आलेल्या आज्ञावलींची भविष्यातील देखभाल व तांत्रिक सहाय्य ही अतिशय महत्त्वाची व आवश्यक बाब असल्याने, सदर प्रकल्पांना स्वयंसहाय्यित बनविण्यासाठी निधीची आवश्यकता आहे. त्यामुळे, सदर निधी उभारण्यासाठी व संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ या अधिकार अभिलेख Application Programming Interface (APIs) व्दारे उपलब्ध करून देणाऱ्या सेवाकरिता आकारण्यात येणाऱ्या शुल्कापैकी काही शुल्क महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेस देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ई-महाभूमि अंतर्गत विविध प्रकल्पांना स्वयंसहाय्यित बनविण्यासाठी आवश्यक असणाऱ्या निधीची उभारणी करण्याच्या दृष्टीने व संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ या अधिकार अभिलेख Application Programming Interface (APIs) व्दारे उपलब्ध करून देण्यात येणा-या सेवाकरिता आकारण्यात येणाऱ्या शुल्काची विभागणी पुढीलप्रमाणे निर्धारित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभाग/संस्था | माहितीचे स्वरूप | प्रस्तावित सेवाशुल्क | विविध घटकांचा हिस्सा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | १ |
| १. | शासकिय विभाग | i)संगणकीकृत स्वाक्षरीत PDF स्वरूपात | i) रू.१०/- प्रति अभिलेख. | i) महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था |
| | | ii) संगणकीकृत डेटा स्ट्रीम (डेटा स्वरूपात) | ii) रू.६/- प्रति अभिलेख. ( प्रति शिट ) | ii) महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था |
| २. | शासकिय विभाग वगळता निमशासकीय व अन्य संस्था. | i)संगणकीकृत स्वाक्षरीत PDF स्वरूपात | i) रू.१५ /- प्रती अभिलेख. | i) महाराष्ट्र शासन-रू.५/-<br>ii) महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था रू.१०/- |
| | | ii) संगणकीकृत डेटा स्ट्रीम (डेटा स्वरुपात) | i) रू.१५ /- प्रती अभिलेख. (प्रती शिट) | i) महाराष्ट्र शासन-रू.५/-<br>ii) महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था रू. १०/- |

२. Application Programming Interface (APIs) व्दारे संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ हे अधिकार अभिलेख ज्यांना उपलब्ध करून द्यावयाचे आहेत त्यांच्यासोबत सामंजस्य करार करण्यासाठी या शासन निर्णयान्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अधिकार देण्यात येत आहेत.

३. Application Programming Interface (APIs) व्दारे संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ हे अधिकार अभिलेख खालील अटी व शर्तीच्या आधारे उपलब्ध करून देण्यात यावेत.

(i) Application Programming Interface (APIs) व्दारे ज्यांना संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ हे अधिकार अभिलेख आवश्यक आहेत, त्यांच्यासाठी प्रीपेड पध्दतीचे वॉलेट उपलब्ध करून देण्यात यावे.

(ii) सदर वॉलेट किती रकमेपर्यंत प्रीपेड करता येईल, याबाबतची मर्यादा याकरीता जामबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी निर्णय घ्यावा.

(iii) सदर वॉलेट मध्ये उपलब्ध असलेल्या रकमेच्या प्रमाणातच संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ हे अधिकार अभिलेख उपलब्ध करून देण्यात यावेत.

(iv) उक्त प्रमाणे प्राप्त होणाऱ्या सेवा शुल्क निधीचे व्यवस्थापन करण्यासाठी महाभूमी प्रकल्प व्यवस्थापन संस्थेने शुल्क व्यवस्थापन प्रणाली विकसीत करावी.

(v)दिनांक ३१.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना स्वतंत्र बँक खाते (Depository Account) नेटबँकींगच्या सुविधेसह स्टेट बँक ऑफ इंडिया, मुख्य शाखा, पुणे येथे उघडण्यास देण्यात आलेल्या परवानगीच्या अनुषंगाने सदर उघडण्यात आलेल्या बॅक खात्यात प्राप्त सेवा शुल्क जमा करण्यात यावे.

(vi) Application Programming Interface (APIs) व्दारे उपलब्ध करून देण्यात आलेल्या अधिकार अभिलेखाच्या वितरणातून प्राप्त शुल्कपैकी महाभूमी प्रकल्प व्यवस्थपन संस्थेचा हिस्सा व्यवस्थापन प्रणाली मधून प्राप्त अहवाला प्रमाणे स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये जमा करण्यात यावा. तर, शासनाचा हिस्सा व्यवस्थापन प्रणाली मधून प्राप्त अहवाला प्रमाणे GRAS प्रणालीव्दारे शासनाच्या विहीत लेखा शीर्षाखाली जमा करणे आवश्यक राहील.

(vii) Application Programming Interface (APIs) व्दारे ज्यांना अधिकार अभिलेख उपलब्ध करून द्यावयाचे आहेत, त्यांच्यासोबत प्रथम एक वर्षासाठी सामंजस्य करार करण्यात यावा. त्यानंतर त्यामध्ये एक एक वर्षाने वाढ करण्यात यावा.

(viii) सामंजस्य कराराच्या कालावधीत जर सेवा शुल्कामध्ये वाढ झाल्यास वाढ होणाऱ्या शुल्काची रक्कम ज्यांनी Application Programming Interface (APIs) व्दारे अधिकार अभिलेख उपलब्ध करण्याबाबत सामंजस्य करार केला आहे, त्यांना वाढ होणारे शुल्क भरल्यानंतरच Application Programming Interface (APIs) ची सेवा देण्यात यावी.

४. Application Programming Interface (APIs) व्दारे संगणकीकृत डिजीटल स्वाक्षरीने गा.न.नं.७/१२ व गा.न.नं.८-अ हे अधिकार अभिलेख उपलब्ध करून देण्याबाबत सामंजस्य करार करताना जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योग्य व आवश्यक वाटतील अशा अटी व शर्तीचा सामंजस्य करारामध्ये समावेश करता येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१८१२२९४२७५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, pseudonym=6A69B309A6281D99F5A420A268723ECE6A8B4A60, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2022.04.18 14:48:25 +05'30'

**( भगवान सावंत )**
**अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
३. सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवान, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सविच, विधान भवन, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७. उपसभापती, विधावपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१०. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई.

११. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३.जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई.
१८.निवड नस्ती (ल-१).